**पूर्व व्यवसायिक तांत्रिक अभ्यासक्रमाच्या तासिकेचा कालावधी / आठवडयाचे एकूण तासिका व प्रात्यक्षिकासाठीची बॅच साईज निश्चित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांकः व्हीओसी २००९/(३६/०९)/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनाक : ६ जुलै, २०१०

संदर्भ : १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२००७/(३५४/०७)/व्यशि-३ दिनांक २२ मे, २००८
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२००९/(३६/०९)/व्यशि-४ दिनांक २२ जुलै, २००९
३) प्रभारी संचालक, व्यवसाय शिक्षण यांचे पत्र क्रमांक ७/शातांवि/२००९/४८ दिनांक २ जून, २००९
४) सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे यांचे पत्र क्र. रा.म./पापुई/पु.व्या./३५२२, दिनांक १.२.२००९

**प्रस्तावना :** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील "२२०३-तंत्रशिक्षण" या मुख्य लेखाशिर्षातर्गत अशासकीय अनुदानित संस्थामधील पदांच्या आढाव्यास संदर्भांकित अनुक्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे, व शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदांची मानके निश्चित करण्यात आलेली आहेत. शिक्षकीय पदाची मानके शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थासाठी एकच आहेत. अशासकीय अनुदानित संस्थांच्या पदांच्या आढाव्यास पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांच्या संघटनेने आक्षेप घेतल्यामुळे आढाव्याचा फेर विचार करण्यासाठी समिती गठित करण्यात आली. समितीच्या बैठकादरम्यान पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रमाच्या तासिकांचा कालावधी आठवडयाच्या एकूण तासिका व प्रात्यक्षिकांची बॅच साईज या बाबत संभ्रम असल्याचे निदर्शनास आल्याची बाब प्रभारी संचालक, (व्यवसाय शिक्षण) यांनी संदर्भाकित क्र.३ च्या पत्रान्वये शासनास कळविली आहे. याबाबत महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे यांनी दिलेल्या अभिप्रायानुसार राज्यातील सर्व शासकीय तंत्र शाळेत पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम राबविले जात आहेत. तथापि, अशासकीय संस्थेमध्ये विषयांकित बाबीबाबत स्पष्टता नाही. त्यामुळे पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम राबविणे बाबत शासन स्तरावरुन स्पष्ट आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रमातील एका तासिकेचा कालावधी, आठवडयाच्या तासिका, प्रात्यक्षिक व सैद्यांतिक यासाठी बॅच साईज तसेच शिक्षकांचा आठवडयाचा कार्यभार हा पुढील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

(अ) पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम राबविणा-या संस्थामध्ये प्रत्येक तासिका ही ३० मिनिटांचा असावी.

(ब) इयत्ता ८,९ व १० वी साठी आठवडयाच्या तासिका अनुक्रमे ६,१२,१२ या प्रमाणे घेण्यात याव्या.

(क) प्रात्यक्षिकासाठी २० विद्यार्थ्यांची बॅच साइज धरण्यात यावी, व थेअरीसाठी ती ६० विद्यार्थ्यांची ठेवण्यात यावी.

(ड) शिक्षक / निदेशकांचा सदर अभ्यासक्रमातील कार्यभार हा विद्यार्थी संख्येनुसार महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी सेवेच्या शर्ती नियमावली, १९८१ मधील नियम क्र.२१ नूसार १७ ते १९ घडयाळीतास ग्राहय धरण्यात यावा.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०१००७०९१३५३५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शोभा वि. पत्की )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :

१) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/नागपूर/अमरावती/लातूर/औरंगाबाद (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)
३) प्र. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/नागपूर/अमरावती/औरंगाबाद (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)
४) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत)
५) संबंधित सर्व अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत, संचालनालयास विनंती करण्यात येते की सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे.)
६) मा.मंत्री (उ.व तं.शि.), यांचे खाजगी सचिव.
७) मा.राज्यमंत्री (उ.व तं.शि.), यांचे खाजगी सचिव.
८) निवड नस्ती (व्यशि-४)

D:\Patki\G.R\Batch & Tasika.doc